**स्वातंत्र्याचा अमृत महोत्सव निमित्त राजभवन येथील बंकरमध्ये थोर क्रांतीकारकाच्या जीवनावर थ्रीडी होलोग्रफिक चित्रपट तयार करण्यास प्रशासकीय मान्यता देण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**पर्यटन व सांस्कृतिक कार्य विभाग**
**शासन निर्णय क्रमांक : संकीर्ण-२०२३/प्र.क्र.५५/सां.का.१**
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.
दिनांक : २० मार्च, २०२३

वाचा : १) शासन निर्णय, पर्यटन व सांस्कृतिक कार्य विभाग, क्रमांक संकीर्ण-८२२१/प्र.क्र.१८४/ सां.का.४, दिनांक २८.०९.२०२१
२) शासन निर्णय, पर्यटन व सांस्कृतिक कार्य विभाग, क्रमांक संकीर्ण-८२२१/प्र.क्र.१८४ (भाग-१)/सां.का.४, दिनांक १३.१०.२०२१
३) शासन परिपत्रक, वित्त विभाग, क्रमांक शासाउ-२०२१/प्र.क्र.०९/सा.उ., दि.२८.०९.२०२१
४) महामहिम राज्यपाल महोदयांचे प्रधान सचिव यांचे दि.१४.०७.२०२२ चे पत्र.
५) पर्यटन व सांस्कृतिक कार्य विभाग, शासन पत्र क्रमांक संकीर्ण-८२२२/प्र.क्र.४१३/ सां.का.४, दिनांक १७.०२.२०२३

**प्रस्तावना :**

राजभवन, मलबार हिल, मुंबई येथील बंकरमध्ये भारताच्या स्वातंत्र्यलढ्यातील क्रांतिकारकांच्या जीवनावर आधारीत क्रांती गाथा गॅलरी स्थापित करण्यात आली आहे. तेथे भेट देणाऱ्या पर्यटकांना बंकर मधील संग्रहालयातून स्वातंत्र्याच्या काळातील महाराष्ट्राची तसेच देशातील महान क्रांतिकारकांच्या जीवनावरील माहिती मिळत असल्याने त्यांच्यामध्ये राष्ट्रीयत्वाची भावना जागृत होत आहे. याच अनुषंगाने या बंकरमध्ये महाराष्ट्रातील थोर क्रांतिकारकांच्या जीवनावर आधारित थ्रीडी होलोग्रफिक (3D Holographic) चित्रपट निर्माण करण्याचे संदर्भ क्र.४ च्या पत्रान्वये प्रस्तावित केले आहे.

भारतीय स्वातंत्र्याला ७५ वर्षे पूर्ण होत असल्याच्या पार्श्वभूमीवर “स्वातंत्र्याचा अमृत महोत्सव” राज्यात साजरा होत आहे. प्रस्तुत प्रकरणी महोत्सव आयोजनासाठी संदर्भ क्र.२ येथील शासन निर्णयान्वये विविध समित्या गठित करण्यात आलेल्या आहेत. त्यास अनुसरुन मा. मंत्री, सांस्कृतिक कार्य यांच्या अध्यक्षतेखाली कोअर समिती गठीत करण्यात आली आहे. या कोअर समितीने आजादी का अमृत महोत्सव अंतर्गत, धोरण समितीने शिफारस केलेल्या कार्यक्रमाच्या आयोजनाची रुपरेषा ठरविणे तसेच निधीच्या नियोजनाबाबत संबंधितांना शिफारस करावयाची आहे. त्यानुसार संदर्भ क्र.४ च्या पत्राअन्वये कोअर समितीच्या दिनांक ५.१२.२०२२ च्या बैठकीत, कोअर समितीने महाराष्ट्रातील थोर क्रांतिकारकांच्या जीवनावर आधारीत थ्रीडी होलोग्राफीक चित्रपट तयार करण्याचे काम दादासाहेब फाळके चित्रनगरी महामंडळ मर्यादित, गोरेगांव, मुंबई यांच्यामार्फत करण्याचे व त्यासाठी स्वातंत्र्याचा अमृत महोत्सव अंतर्गत निधीमधून रू.५.०० कोटी इतक्या खर्चाच्या कामास मान्यता दिल्याचे इतिवृत्त {इतिवृत्तातील अ.क्र. ६ (१)} प्राप्त झाले आहे.

त्यानुसार महाराष्ट्र चित्रपट, रंगभूमी आणि सांस्कृतिक विकास महामंडळ मर्यादित, दादासाहेब फाळके चित्रनगरीमार्फत “राजभवन येथील बंकरमध्ये महाराष्ट्रातील थोर क्रांतिकारकांच्या जीवनावर आधारित थ्रीडी होलोग्राफीक चित्रपट निर्माण करण्याच्या कामास व त्यासाठी स्वातंत्र्याचा अमृत महोत्सव अंतर्गत निधीमधून करावयाच्या रुपये पाच कोटी इतक्या अपेक्षित खर्चास महाराष्ट्र चित्रपट, रंगभूमी आणि सांस्कृतिक विकास महामंडळ मर्यादित, यांच्या संचालक मंडळाने मान्यता दिली आहे. याअनुषंगाने सदर कामास प्रशासकीय मान्यता देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :**

महाराष्ट्र चित्रपट, रंगभूमी आणि सांस्कृतिक विकास महामंडळ मर्यादित, दादासाहेब फाळके चित्रनगरी, गोरेगाव, मुंबई यांच्यामार्फत मलबार हिल, मुंबई येथील राजभवनमधील येथील बंकरमध्ये थोर क्रांतीकारकांच्या जीवनावर थ्रीडी होलोग्राफीक (3D Holographic) चित्रपट कामासाठी करण्यासाठी येणाऱ्या रु.५,००,००,०००/- (अक्षरी रुपये पाच कोटी फक्त) इतक्या खर्चास खालील अटी व शर्तींच्या अधीन राहून प्रशासकीय मान्यता देण्यात येत आहे.

i) काम सुरू करण्यापूर्वी आवश्यक विहित प्रक्रिया राबवूनच काम सुरु करावे.

२. सदर कामावरील खर्च "मागणी क्र झेडडी-२, २२०५ कला व संस्कृती, १०२ कला व संस्कृती प्रचालन, (१३) स्वांतत्र्याचा अमृत महोत्सव (१३)(०१) स्वांतत्र्याचा अमृत महोत्सवांतर्गत कार्यक्रम (कार्यक्रम) (२२०५ ३७३३), ५० इतर खर्च" या लेखाशिर्षाखाली सन २०२२-२३ या वित्तीय वर्षात मंजूर करण्यात आलेल्या अनुदानातून भागविण्यात यावा.

३. सदर शासन निर्णय, वित्त विभागाच्या शासन निर्णय क्रमांक विअप्र-२०१३/प्र.क्र.३०/२०१३/ विनियम, भाग-२, दिनांक १७.४.२०१५ सोबतच्या परिशिष्ट भाग-पहिला, उपविभाग-तीन मधील अनुक्रमांक ०४ परिच्छेद क्र. २७ (२)(अ) नुसार प्रशासकीय विभागांना प्रदान करण्यात आलेल्या अधिकारात व नियोजन विभागाच्या सहमतीने निर्गमित करण्यात येत आहे.

४. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक क्रमांक २०२३०३२०१७४३३३०८२३ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकीत करून काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

VIDYA HEMANT WAGHMARE

Digitally signed by VIDYA HEMANT WAGHMARE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=TOURISM AND CULTURAL AFFAIRS DEPARTMENT, 2.5.4.20=4e214bf8a250420c28c2084d8dd965c0d454568322bd41981d48971712e51795, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=F93EFE7B946BF26FF989D6E5E01E1B122B9EB4E3E4E6799CB8E82B2D33D58DFC, cn=VIDYA HEMANT WAGHMARE
Date: 2023.03.21 19:04:16 +05'30'

**( विद्या वाघमारे )**
**उप सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत:**

१. मा. राज्यपाल यांचे प्रधान सचिव, राजभवन, मलबार हिल, मुंबई
२. मा. मुख्यमंत्री, यांचे प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई
३. मा. उपमुख्यमंत्री तथा वित्तमंत्री यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई
४. मा. मंत्री, सांस्कृतिक कार्य यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई
५. मा. मुख्य सचिव, महाराष्ट्र राज्य, मंत्रालय, मुंबई
६. मा.अपर मुख्य सचिव (राजशिष्टाचार), सामान्य प्रशासन विभाग, मंत्रालय, मुंबई
७. व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र चित्रपट, रंगभूमी व सांस्कृतिक विकास महामंडळ मर्यादित, दादासाहेब फाळके चित्रनगरी,गोरेगाव, मुंबई
८. नियोजन विभाग(कार्यासन ), मंत्रालय, मुंबई
९. वित्त विभाग (व्यय-१५/अर्थसंकल्प-११), मंत्रालय, मुंबई
१०. महालेखापाल, महाराष्ट्र-१ (लेखा परीक्षा/ लेखा अनुज्ञेयता), मुंबई,
११. लेखा व अधिदान अधिकारी, मुंबई.
१२. निवासी लेखा परीक्षा अधिकारी, मुंबई
१३. संचालक, सांस्कृतिक कार्य संचालनालय, मुंबई
१४. अवर सचिव (अर्थसंकल्प शाखा) पर्यटन व सांस्कृतिक विभाग, मंत्रालय, मुंबई
१५. अवर सचिव, रोख शाखा, पर्यटन व सांस्कृतिक विभाग, मंत्रालय, मुंबई
१६. अवर सचिव (सांका-४), पर्यटन व सांस्कृतिक विभाग, मंत्रालय, मुंबई.
१७. निवडनस्ती / कार्यासन सां का -१.